**स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजने अंतर्गत तालुकास्तरावरील कायम स्वरुपी विक्री केंद्राचे ठिकाण तालुका मुख्यालयाऐवजी तालुक्यात इतर गावात घेण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : पणन-२०१०/प्र.क्र.१७४/योजना-१**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दि.१ जून, २०११**

**संदर्भ - शासन निर्णय ग्राम विकास विभाग, क्र.पणन-२००८/प्र.क्र.७३८/ योजना-१, दिनांक - २७ फेब्रुवारी, २००९**

**प्रस्तावना :-**

ग्राम विकास विभागामार्फत १९९९ पासून दारिद्रय रेषेखालील कुटुंबातील व्यक्तींचे जीवनमान उंचावून देशातील प्रगत तंत्रज्ञान सोप्या पध्दतीने त्यांच्यापर्यन्त पोहोचवून त्यांना रोजगार मिळवून देऊन त्यांचे उत्पादन किमान रु.२०००/- प्रति महा इतके व्हावे, या उद्देशाने स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजना (७५% केंद्र व २५% राज्य पुरस्कृत) योजना राबविण्यात येत आहे. यामध्ये स्वयंसहायता गट/स्वरोजगारी यांना व्यवसायाभिमुख प्रशिक्षण देण्यात येते. तसेच त्यांना व्यवसायासाठी अनुदान व कर्जही उपलब्ध करुन देण्यात येते. या स्वरोजगारीने तयार केलेल्या वस्तुंना हक्काची बाजारपेठ मिळविण्याकरीता संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक २७ फेब्रुवारी, २००९ अन्वये जिल्हयाच्या व तालुक्याच्या ठिकाणी कायमस्वरुपी विक्री केंद्र बांधण्याचा निर्णय घेण्यात आला. परंतु काही तालुक्यांच्या ठिकाणी नगरपरिषदा असल्याने विक्री केंद्रांसाठी जागा उपलब्ध होत नाही. तसेच काही तालुक्यांच्या मुख्यालयाच्या ठिकाणी तालुक्यातील इतर मोठया गावांपेक्षा लोकवस्ती कमी असल्याने मालाच्या विक्रीसाठी योग्य बाजारपेठ उपलब्ध होत नाही व त्यामुळे तालुका केंद्र बांधण्याचा उद्देश सफल होत नाही. त्यामुळे सदरील तालुका विक्री केंद्र तालुकांच्या ठिकाणी बांधण्याची अट शिथील करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

संदर्भाधीन शासन निर्णय, दिनांक २७ फेब्रुवारी, २०१० अन्वये जिल्हयाच्या व तालुक्याच्या ठिकाणी कायमस्वरुपी विक्री केंद्र बांधण्याचा निर्णय घेण्यात आला. सदरील तालुका विक्री केंद्र बांधण्याकरीता तालुका मुख्यालयाच्या ठिकाणी सुयोग्य जागा कोणत्याही कारणाने मिळत नसल्यास अथवा तालुक्याच्या मुख्यालयापेक्षा जास्त लोकसंख्या असलेली व चांगली बाजारपेठ असलेली गावे असतील तर तालुका मुख्यालयाच्या ऐवजी तालुक्यात सर्वात जास्त लोकसंख्या असलेल्या वा / किंवा मोठी बाजारपेठ असलेल्या गावाच्या ठिकाणी विक्री केंद्र बांधण्यास या शासन निर्णयान्वये परवानगी देण्यात येत आहे. त्याचप्रमाणे समर्थनीय कारणासह शासनाकडे प्रस्ताव पाठविण्यात यावेत.

२ सदरील विक्री केंद्र बांधताना संदर्भाधीन शासन निर्णय, दिनांक २७ फेब्रुवारी, २००९ मध्ये नमूद करण्यात आलेल्या इतर अटी व शर्ती कायम राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०११०६०७०९५१५८००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

सही/-
**(अविनाश सुभेदार)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
४. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव,
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १, मुंबई
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र - २, नागपूर
७. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई,
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर
९. संचालक, लेखा व कोषागारे मुंबई,
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
११. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१२. सर्व मंत्रालयीन विभाग
१३. विभागीय आयुक्त, (सर्व)
१४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, (सर्व)
१५. उप आयुक्त (विकास) विभागीय आयुक्त यांचे कार्यालय (सर्व)
१६. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, (सर्व)
१७. सह सचिव, वित्त विभाग, मंत्रालय-३२, मुंबई यांना त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र.अनौसं.१६/०९/व्यय-१५, दि३.२.२००९ च्या अनुषंगाने.
१८. सह सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई यांना त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र.अनौसं.१०/का १४४३, दि.३.२.२००९ च्या अनुषंगाने.
१९. सर्व उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
२०. अवर सचिव/कार्यासन अधिकारी, कार्यासन क्र.योजना-३/योजना-७/वित्त-१
२१. निवडनस्ती, योजना-१, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.

*-*-*-*-*